**महाराष्ट्र ग्रामदान मंडळास सन २०२०-२१ करिता सहायक अनुदान देणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- ग्रामदा-२०२०/प्र.क्र.१/ज-१अ**
पहिला मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १५ ऑक्टोबर, २०२०

<u>संदर्भ-</u>
१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.जीडीएन १०७४/१६०७/ग-२, दि.१४/५/१९७६.
२. महसूल व वन विभाग, शासन अधिसूचना क्र.ग्रामदान-२०१९/प्र.क्र.६३/ ज-१अ, दि.९/८/२०१९.
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२०/२२२५/ प्र.क्र.७१/ ब-१,दि. २०/०४/२०२०.
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.४/५/२०२०
५. महसूल व वन विभाग/कार्यासन ब-२ ची दिनांक २७/५/२०२० ची टिपणी
६. महाराष्ट्र ग्रामदान मंडळाचे दि.४/७/२०२० चे पत्र

**<u>शासन निर्णय:-</u>**

संदर्भाधीन क्र.२, शासन राजपत्रातील अधिसूचना क्र. ग्रामदान-२०१९/प्र.क्र.६३/ ज-१अ, दि.९/८/२०१९ अन्वये, मा. श्री.जयवंत गंगाराम मठकर यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र ग्रामदान मंडळाची पुर्नस्थापना करण्यात आलेली आहे. संदर्भाधीन क्र.१, महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. जीडीएन-१०७४/१६०७/ग-२, दि.१४.५.१९७६ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला अनुदान देण्याबाबत अटी व शर्ती विहित करण्यात आल्या आहेत. त्यानुषंगाने, संदर्भाधीन क्र.६ दिनांक ४/७/२०२० च्या पत्रान्वये, महाराष्ट्र ग्रामदान मंडळाने सन २०२०-२१या आर्थिक वर्षाकरिता सहायक अनुदान वितरीत करण्याची शासनास विनंती केलेली आहे.

**०२.** यानुषंगाने नमूद करण्यात येते की, संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयानुसार, महाराष्ट्र ग्रामदान मंडळास कार्यकर्त्यांचे मानधन, कार्यालयीन खर्च, कार्यकर्ता प्रशिक्षण व इतर किरकोळ खर्च इत्यादी खर्च भागविण्याकरीता सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पात रु.१०,००,०००/- (रुपये दहा लाख फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली होती. तसेच, संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयानुसार, वित्त विभागाने एकूण अर्थसंकल्पीत निधीपैकी एकूण वार्षिक तरतूदीच्या ३३ टक्के एवढया रक्कमेपर्यंत निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे या विभागास उपलब्ध करुन दिलेला असून सदर निधी या कार्यक्रमांतर्गत वितरणासाठी उपलब्ध असल्याचे नमूद केले आहे. त्यानुसार, संदर्भ क्र.५ अन्वये, महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला सहायक अनुदान (२२२५००६५) या लेखाशीर्षाखाली रु.१० लाख इतक्या अनुदानाच्या ३३% च्या मर्यादेत रु.३,३०,०००/- (रुपये तीन लाख तीस हजार फक्त) इतके

अनुदान वित्त विभागाने सदय:स्थितीत मान्य केले असून त्यापैकी, माहे सप्टेंबर,२०२० अखेर अर्थसंकल्पिय वितरण प्रणाली (BDS) वर रु.२,००,०००/- (रुपये दोन लाख फक्त)उपलब्ध केले आहेत.

**०३.** तरी, महाराष्ट्र ग्रामदान मंडळास कार्यकर्त्यांचे मानधन, कार्यालयीन खर्च, कार्यकर्ता प्रशिक्षण व इतर किरकोळ खर्च इत्यादी खर्च भागविण्याकरीता रु.२,००,०००/- (रु.दोन लाख फक्त) इतकी रक्कम मंजूर करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली तरतूद "आहरण व संवितरण अधिकारी, रोख शाखा" महसूल व वन विभाग यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलांसोबत जोडल्या जाणाऱ्या कॉम्प्युटर स्लिपमध्ये गौण/उपशीर्षाच्या संगणक संकेतांकांचा न चुकता उल्लेख करावा.

आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.सं.धो.डगळे, कक्ष अधिकारी, रोख शाखा, महसूल व वन विभाग यांच्या सहीने व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. अ.सो.देशमुख, उप सचिव, महसूल व वन विभाग यांच्या प्रतिस्वाक्षरीने याबाबतचे देयक तयार करून अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे पाठवावे.

**०४.** सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला या आदेशाद्वारे मंजूर करण्यात आलेली अर्थसंकल्पीत निधीपैकी एकूण वार्षिक तरतूदीच्या ३३ टक्केच्या मर्यादेपैकी म्हणजेच रु.३,३०,०००/- (रुपये तीन लाख तीस हजार फक्त) इतक्या रक्कमेपैकी रु.२,००,०००/-(रुपये दोन लाख फक्त) " सी-५-२२२५-अनुसूचित जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण -८०- सर्वसाधारण -८०००-इतर खर्च- (००) (०२)- महाराष्ट्र ग्रामदान मंडळाला सहाय्यक अनुदान- (२२२५००६५), (दत्तमत) ३१-सहायक अनुदान (योजनेत्तर)" या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकण्यात यावी. सदर रकमेचा रेखीत धनादेश " अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ (Chairman, Maharashtra Gramdan Mandal)" यांच्या नावे काढण्यात यावा.

**०५.** अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ यांनी सन २०२०-२१ करीता मंजूर वितरीत अनुदानातून केलेल्या खर्चाचा ताळमेळ घालून आणि लेखापरीक्षण करुन,लेखापरीक्षण अहवाल शासनास सादर करावा.

**०६.** महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२० च्या अनुषंगाने शासन वित्त विभागाने निर्गमित केलेल्या परिपत्रक अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३,दि.१६/४/२०२०सोबतच्या परिशिष्ठातील बाब.क्र.३ मध्ये नमूद केल्यानुसार प्रस्तुत जुन्या योजनेत्तर योजनेच्या स्वरूपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने वित्त विभागाची सहमती आवश्यक नाही.

**०७.** सदर शासन निर्णय निर्गमित करताना शासन निर्णय वित्त विभाग क्र.१००८/प्र.क्र.७० /२००८/विनिमय, दि.१५/०५/२००९ अनुक्रमांक-२७, नियम क्रमांक- १४९ मधील अटींचे पालन केले आहे.

**०८.** सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२०१०१५१७३९०४४३१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAMESH SHIVAJI CHAVAN

Digitally signed by RAMESH SHIVAJI CHAVAN
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=7ada4e8fa11566f3b9c9f7b5fa123945d54f8e3d5b09d05bedfa09b97ee45cad, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=eb458b05e05ee27f435bd399537405d44e1c88021cf038b060ac10b9d8fb8787, ou=REVENUE, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAMESH SHIVAJI CHAVAN
Date: 2020.10.15 17:40:46 +05'30'

**( रमेश चव्हाण )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) महालेखापाल (लेखापरीक्षा) (लेखा व अनुज्ञयेता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
२) अधिदान लेखा अधिकारी, मुंबई
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव./वि.का.अ., मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६) अपर सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मुंबई-३२
७) उप सचिव (रोख शाखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) उप सचिव (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९) सह सचिव (ज-१अ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) श्री.जयवंत गंगाराम मठकर, अध्यक्ष, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ, ९-१०, प्रथम, हॅप्पी कॉलनी, कोथरुड, पुणे-३०
११) अवर सचिव (रोखशाखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) कार्यासन अधिकारी (ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) अर्थसंकल्प -४/व्यय-९, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) कार्यासन अधिकारी (ल-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५) श्री. मारोतराव तुळशीराम खैरकर, सचिव, महाराष्ट्र ग्रामदान मंडळ, , मु.पो.नेहरोली, ता.वाडा, जि.पालघर-४२१३१२.
१६) निवडनस्ती (ज-१अ).